महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५ अंतर्गत लोकसेवा नियत कालमर्यादा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी प्रसिध्द करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१८/प्र.क्र. १०४ /कामगार ९**
मंत्रालय विस्तार, मुंबई ३२
दिनांक : ११ डिसेंबर, २०१८

**वाचा** : १) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक संकिर्ण २०१५/प्र.क्र. १२/ कामगार ९ दिनांक १२ ऑक्टोबर, २०१५
२) संचालक, बाष्पके संचालनालय यांचे पत्र क्र. एसबी.१/जिएल./२०१६/१७२०५१ दिनांक १५ मार्च, २०१६

**प्रस्तावाना :**

उपरोक्त संदर्भ क्र. १ व संदर्भ क्र. २ येथे नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णयान्वये कामगार विभागाच्या प्रशासकीय अधिपत्याखालील औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयामार्फत पुरविण्यात येणाऱ्या चार सेवांचा महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमांतर्गत पुरवावयाच्या सेवांमध्ये समावेश करण्यात आलेला आहे. प्रशासकीय कारणास्तव सदर सेवांमध्ये सुधारणा होणे आवश्यक असून तसेच या व्यतिरिक्त औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयामार्फत पुरविण्यात येणाऱ्या इतर सेवा महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमाच्या कलम ३ नुसार अधिसूचीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ व संदर्भ क्र.२ येथे नमूद करण्यात आलेले शासन निर्णयामधील काही लोकसेवा सुधारीत / रद्द करुन व काही सेवांचा नव्याने समावेश करुन एकत्रितपणे अधिसूचीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

१. दि.१२ ऑक्टोबर,२०१५ व दि.१५ मार्च,२०१६ चे संदर्भाधिन शासन निर्णय रद्द करण्यात येत असुन महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम,२०१५ अंतर्गत शासनाचे सुधारीत आदेश पुढीलप्रमाणे देण्यात येत आहेत. या शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या ६ सेवा संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांच्या कार्यालयामार्फत उक्त अधिनियमाच्या कलम ३ नुसार अधिसूचीत करावयाच्या आहेत.

२. या अधिनियमांतर्गत सेवा पुरविण्यासाठी आकारावयाची फी निश्चित करण्याची संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांना मूभा राहील. तसेच संबंधीत कार्यालयाची रचना विचारात घेवून पदनिर्देशित अधिकारी , प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी इत्यादीमध्ये संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांना आवश्यक्तेप्रमाणे सुधारणा करता येईल.

३. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी त्यांच्यामार्फत पुरविण्यात येणाऱ्या लोक सेवांची सूची, नियत कालमर्यादा, अर्जाचा विहीत नमूना, फी, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी यांचा तपशिल कार्यालयाच्या सूचना फलकावर तसेच त्यांच्या संकेतस्थळावर किंवा पोर्टलवर प्रदर्शित करावा.

४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी उपरोक्त प्रमाणे उक्त अधिनियमाच्या कलम ३ नुसार सेवा अधिसूचीत करणे व त्यांची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१२१११४४२३५१४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2018.12.11 14:46:44 +05'30'

**(डॉ.श्रीकांत ल.पुलकुंडवार)**
उप सचिव महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
७. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, भूखंड क्र. सी-२०, ब्लॉक इ, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
८. सर्व प्रादेशिक कार्यालये, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य
९. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. निवडनस्ती

# परिशिष्ट

| अ क्र | लोकसेवेचा तपशिल | लोकसेवा पुरविण्यासाठी विहित केलेली कालमर्यादा | पदनिर्देशित अधिकारी | प्रथम अपिलिय अधिकारी | द्वितीय अपिलिय अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत नोंदणी व परवाना देणे व परवाना नुतनीकरण करणे. (अति धोकादायक/धोकादायक कारखाने वगळून इतर कारखाने) | ७ दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |
| २. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत नोंदणी व परवाना देणे. (अति धोकादायक/धोकादायक कारखाने) | ६० दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |
| ३. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत परवाना नुतनीकरण करणे. (अति धोकादायक/धोकादायक कारखाने) | ६० दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |
| ४. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत कारखान्यांचे नकाशे मंजूर करणे. | ४५ दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |
| ५. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत परवाना दुरुस्ती करणे. (अति धोकादायक/धोकादायक कारखाने वगळून इतर कारखाने) | ७ दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |
| ६. | कारखाने अधिनियम,१९४८ व महाराष्ट्र कारखाने नियम,१९६३ अंतर्गत परवाना दुरुस्ती करणे. (अति धोकादायक/धोकादायक कारखाने) | ६० दिवस | संबधित विभागातील अपर/सह संचालक | अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. | संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई. |